46

**प्रशासकीय मान्यता-**
जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र व दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, भूम जि.उस्मानाबाद यांचे न्यायालयाकरीता अतिरिक्त न्यायालय इमारत बांधण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन,**
**विधी व न्याय विभाग,**
शासन निर्णय क्र.सीसीबी-२६१०/६/प्र.क्र१७/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- 6 मे, २०१०.

पहा :- १) प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु) ६०५७/१९७०, दिनांक २२ डिसेंबर, २००९.
२) प्रमुख जिल्हा न्यायाधिश, उस्मानाबाद यांचे पत्र क्र.काध्यवि/प्रशा/५३९१, दि.२२ जुलै.२००९.

शासन निर्णय:- जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त सत्र न्यायाधीश आणि दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, भूम, जि.उस्मानाबाद यांच्या न्यायालयाकरिता ३ इमारत बांधण्याच्या रु.३,५४,१८,७४५/-(रुपये तीन कोटी चौपन्न लक्ष अठ्ठरा हजार सातशे त्रेचाळ फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

रुपये

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | २,५४,४६,२२५ |
| २ | आकस्मिक खर्च | १०,१७,८४९ |
| ३ | विद्युतीकरण (११%) | २७,९९,०८५ |
| ४ | बाह्यपाणी पुरवठा व मलनि:सारण (८%) | २०,३५,६९८ |
| ५ | अंतर्गत रस्ते | २,००,००० |
| ६ | स्ट्रीट लाईटस् | ५०,००० |
| ७ | बोअरवेल आणि पंप | १,५०,००० |
| ८ | गार्डनिंग | १,००,००० |
| ९ | फाटकासह आवार भिंत | ३,००,००० |
| १० | मोटार शेड व स्टॅंड | १,००,००० |
| ११ | मावजाद (१०%) | ३२,१९,८८६ |
| | एकूण | ३,५४,१८,७४३ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी जमीनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.

मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे."

३) "अंतर्गत डांबरी रस्ते,कुंपन भिंत, इत्यादि बांधकामांची छेद नकाशासह मापे विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करूनच काम सुरु करण्यात यावे.".

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतुद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-५६/इमा-२, दिनांक-५.३.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिशिष्ट क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ए. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय,मुंबई.
प्रबंधक (निरीक्षणे-२),उच्च न्यायालय (अपिल शाखा),मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,उस्मानाबाद.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक,मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन,नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,उस्मानाबाद
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उपविभागीय अभियंता,सार्वजनिक बांधकाम उपविभाग, भूम,जिल्हा-उस्मानाबाद,
जिल्हा कोषागार अधिकारी,उस्मानाबाद.
उप कोषागार अधिकारी, उस्मानाबाद
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी.२३/१,साऊथ अंबाझरी रोड,अंध विद्यालयाजवळ,नागपूर.
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.